# हॅरी हूदीनी

लेखन: एलिज़ाबैथ मैक्लाउड

चित्र: जॉन मान्टा

मराठी: अश्विनी बर्वे



# हॅरी हूदीनी

लेखन: एलिज़ाबैथ मैक्लाउड

चित्र: जॉन मान्टा

मराठी: अश्विनी बर्वे



तो कोण होता जो हातांना नजरेपासून दूर करू शकत होता?

जो विटेची भिंत भेदून पार करू शकत होता?

जो पाण्याच्या खालून हातकडी सोडून बाहेर निघू शकतो?

जो साखळीला बांधलेले असून आणि कुलुपात बंद असूनही स्वातंत्र मिळू शकतो?



जो सगळ्यांना अचंबित करणारा जादुगार होता ?

हॅरी हूदीनी शिवाय कोण असणार भला?



हॅरी हूदीनीचे खरे नाव होते एरिक वाइस. पण त्याचा परिवार आणि मित्र त्याला 'एयरी' नावाने हाक मारत.

एयरी १८७४ मध्ये हंगेरीमध्ये जन्माला आला.

एयरीच्या वडिलांना काम मिळते नव्हते. एयरी दोन वर्षाचाच होता तेव्हा त्याचे वडील अमेरिकेत गेले. आपल्या मागे त्यांनी आपली पत्नी आणि पाच मुले ठेवली होती.

अमेरिकेत एयरीचे वडील विस्कॉन्सिनमध्ये राहत. त्यांनी खूप मेहनतीने काही पैसे वाचवले. दोन वर्षात त्यांनी एवढे पैसे वाचवले की ते आपला परिवार अमेरिकेत घेऊन गेले.



जेव्हा एयरी आठ वर्षाचा झाला त्याने आपल्या जीवनातील पहिला जादूचा कार्यक्रम बघितला. ज्या जादुगाराला त्याने बघितले त्याचे नाव डॉ. लिन.

डॉ. लिन जेव्हा आपली जादू पेश करत असे, तेव्हा वाटत असे की त्यांनी एखाद्या व्यक्तीचे हात, पाय आणि डोके छाटले आहे.पण तेव्हा जादूने ते हात,पाय आणि डोके धडाला जोडले. एयरीने हे सगळे बघितले आणि मुग्ध झाला. त्याने खूप टाळ्या वाजवल्या.




एयरीला कलाकारसुद्धा विचारात पाडत असत. त्यांना झोक्याला लटकून कसरत करतांना बघायला एयरीला खूप आवडत असे.

एयरीने स्वतःच आपल्यासाठी एक असा कसरत करता येईल असा झोका तयार केला आणि आपल्या कसरती करू लागला. गल्लीतील मुले त्याची कसरत कला बघण्यासाठी येत आणि पैसे देत. एयरीयात एवढा कुशल झाला की तो स्वतःला 'हवेतला राजकुमार' म्हणू लागला.



१८८३ पर्यंत एयरीला अजून एक भाऊ आणि एक बहीण झाली. इकडे वडिलांना परत काम शोधण्यासाठी मेहनत करावी लागत होती. परिवार गरिबीत राहत होता.

एका बर्फाळ दिवशी, एयरी फुटपाथवर उभा राहून भीक मागत होता. तो आपली टोपी हातात घेऊन हालचाल न करता भूतासारखा उभा होता. त्याच्या डोक्यावर बर्फ जमा झाला होऊ लागला. पण त्याच्या टोपीत नाणे जमा होऊ लागले होते.





एयरीने सर्व नाणी आपल्या कपड्यात लपवले. तेव्हा तो घरी पळाला आणि आईला म्हणाला की तिने त्याला हलवावे. हलवल्याबरोबर नाणी सगळीकडे उडत पसरले. हे एयरीचे जादुगिरी कौशल्य होते.

सतत स्वतःला थकलेले बघणे आणि गारठलेले बघणे आणि भुकेले राहणे याचा एयरीला त्रास होत होता. म्हणून जेव्हा तो १२ वर्षाचा झाला तेव्हा तो घरातून पळून गेला.



एयरीने न्यूयॉर्क शहरात एक नोकरी शोधली. पण तो हे विसरला नाही की त्याला जादूत रस आहे.

जेव्हा एयरी सतरा वर्षाचा झाला त्याने आपल्या मित्राला घेऊन एक कार्यक्रम तयार केला. आता त्यांना अशा एका नावाचा शोध होता जे लोकांच्या लक्षात राहिल.

एयरीने ठरवले की तो आपले आडनाव 'हूदीनी' ठेवेल. स्वतःचे नाव त्याने हॅरी ठेवले. कारण ते एयरीशी मिळते-जुळते होते.



हैरी आणि त्याच्या मित्रांनी स्वतःला 'द ब्रदर्स हूदीनी' म्हणजे हूदीनीचे भाऊ म्हणायला सुरुवात केली.



हैरी आणि त्याचा मित्र पत्तांची जादू दाखवत असत. ते मेणबत्तीच्या ज्योतीतून रुमाल काढून दाखवत.

हैरीच्या कोटाचा बटणाच्या छिद्रातून म्हणजे काज्यातून अचानक एक फुल दिसत असे. तो रुमालाचा रंग बदलत असे.



नंतर हैरीने इतर लोकांबरोबर सुद्धा भागीदारी केली. तेव्हा १८९४ च्या वसंतात त्याची भेट बैस राहनरशी झाली.

बैस एक गायिका आणि नृत्यांगना होती.दोघांचे एकमेकांवर प्रेम जमले. आणि त्यांनी लग्न केले.लवकरच बैस मंचावर हैरीची भागीदार झाली.



हैरी आणि बैस यांनी मिळून सगळ्यात चांगली कामगिरी केली होती. ज्यात हैरी एका कापडाच्या गोणीत घुसतो. तेव्हा गोणी करकचून बांधून टाकली जाते. यानंतर गोणी एका पेटीत ठेवली जाते. पेटीला मोठ्या दोरीने बांधली जाते आणि ती एका पडद्याच्या मागे ठेवली जाते.

बैस तेव्हा तीनवेळा टाळ्या वाजवते आणि लवकरच पडदा बंद करते. लवकरच पडदा उघडतो – पण तो हैरी उघडतो.!

आणि बैस? ती पेटीच्या आत गोणीत बांधलेली सापडते.






प्रेक्षकांना ही कामगिरी खूप आवडत असे. पण बाकी कार्यक्रम त्यांना कंटाळवाणा वाटत असे. हूदीनी दांपत्याला बघण्यासाठी येणारे लोक तर याहून कमी होऊ लागले होते.

१८९९ मध्ये हैरीने दुःखित मनाने हे ठरवले की तो जादुगिरी सोडून देईल. पण त्याआधी त्याला आणि बेसला काही ठरवलेले कार्यक्रम करायचे होते.

त्यांच्या एका कार्यक्रमात ती व्यक्ती उपस्थित होती जो एका मोठ्या थिएटरसाठी कार्यक्रम निवडत असे. त्याने में हैरी आणि बैसचा 'एस्केप' (सुटकेचा) ची कामगिरी खूप आवडली.

''जादुगिरीच्या छोटछोट्या कामगिरी विसरून जा," त्याने हूदीनी दांपत्याला सल्ला दिला. "फक्त 'सुटके' ची कामगिरी करा.

हैरी आणि बैसने हा सल्ला आजमावण्याचा निर्णय घेतला.



लवकरच हैरी आणि बैसला सफलता मिळाली. पण हैरीला समजून चुकले होते की प्रेक्षक लवकरच उबु शकतो. म्हणून, तो नवनवीन गोष्टींचा शोध घेऊ लागला.

१९०७ मध्ये हजारो लोकांची गर्दी एका पुलावर एकत्र आली. त्यांनी हैरीला साखळ्यानी आणि हातकड्या घालून जखडून ठेवलेले पाहिले.







हैरीने खोल श्वास घेतला आणी पुलावरून नदीमध्ये उडी मारली. तो बुडणार होता का?

अचानक हैरी पाण्यातून बाहेर आला. तो साखळ्यांच्या जोखडातून बाहेर पडला होता. त्याच्या हातातल्या हातकड्या मोकळ्या होत्या.

गर्दी हे कौशल्य बघून आश्चर्यचकित झाली.

दुसऱ्या वर्षी हैरीने दुधाच्या मोठ्या किटलीतून बाहेर येण्याचे कौशल्य दाखवले. त्याला आधी हातकडी घातली गेली. तेव्हा तो कसातरी किटलीत घुसला.

किटलीत पाणी भरले गेले. त्याचे झाकण लावून टाकले गेले. पर्याय दोन होते-एकत्र तर तो बुडेल, नाहीतर वाचेल.

सेकंद पुढे जाऊ लागले. प्रेक्षक वेडे झाले. शेवटी हैरी बाहेर्र आला.





१९१२ मध्ये हैरीने आपल्या कार्यक्रमात नवीन कौशल्य जोडले. तो काचेने तयार केलेल्या कपाटात उलटा लटकला. त्या कपाटाला पाण्याने भरले गेले. त्याचे पाय जाड जड साखळ्यांनी बांधून टाकले. पण हैरी मिनिटांमध्ये बाहेर आला.



काही काळानंतर हैरीने अजून एक अनोखे कौशल्य दाखवले. त्याला रस्त्यावर एका विशेष प्रकारच्या जैकेटमध्ये बांधून टाकले गेले. जैकेटमध्ये त्याचे हात त्याच्या शरीराला पक्के बांधले. अशा अडकलेल्या परिस्थितीतून बाहेर पडणे मुश्किल होते.





नंतर हैरीला हवेत वर उचलले गेले. त्याला खाली उभ्या असणाऱ्या गर्दीच्या वर उलटे लटकवले गेले.

हैरीने हातपाय झटकले, त्याने आपले शरीर वाकडेतिकडे केले. आणि थोड्याच वेळात तो जैकेटमधून बाहेर आला. तो परत बंधनातून बाहेर आला.



यावेळे पर्यंत हैरी जगभर प्रसिद्ध झाला होता. तो जिथे जाईल तिथे गर्दी होत असे. वर्तमानपत्रात त्याच्या अनोख्या कौशल्याचे कहाण्या छापल्या जात.

हैरी आता श्रीमंत झाला होता. तो आठवड्यात एवढे कमवत असे की लोक वर्षभरात सुद्धा कमवू शकत नसत.



१९२६ च्या ऑक्टोबरमध्ये हैरी अमेरिका आणि कॅनडामध्ये आपल्या जादूचे प्रदर्शन करत होता.

क्यूबैकच्या मॉन्ट्रियाल शहरामध्ये तो ज्या खोलीत तयार होत असे तिथे काही मुलांशी तो बोलत होता.



त्यातल्या एका तरुणाला माहीत करून घ्यायचे होते की खरेच त्याच्या पोटावर बुक्के मारले तरी त्याला लागत नाही का?

‘‘हो,’’ हैरीने उत्तर दिले. “पण त्यासाठी मला आधी तयारी करावी लागते.”

पण हैरी स्वतःला तयार करण्याच्या आतच तो मुलगा त्याच्या पोटावर बुक्के मारू लागला. हैरीला शेवटी त्याला थांबवावे लागले.

हैरीच्या पोटावर जखमा झाल्या होत्या. तरीही त्याने आपले प्रयोग पूर्ण केले.



त्याच रात्री हैरी ट्रेन पकडून आपल्या पुढच्या कार्यक्रमासाठी डैट्राइट, मिशिगनकडे निघाला. त्याला वेदना होत होत्या. तरीही त्याने आपला कार्यक्रम रद्द केला नाही.

जेव्हा कार्यक्रम पूर्ण झाला तेव्हा तो थकला होता. त्याला दवाखान्यात नेले गेले. पण तोपर्यंत खूप उशीर झाला होता. हैरीचा मृत्यू हैलोवीनच्या दिवशी झाला.





लोक आजही हैरीच्या आश्चर्यकारक कौशल्यांबद्दल बोलतात. आपले कौशल्य आणि आपल्या कल्पनाच उपयोग करून हैरी असे प्रयोग करत राहिला जे आधी कोणी पाहिले नव्हते.

तर सगळ्यात प्रसिद्ध जादुगार कोण होता? निःशंक हैरी हूदीनी!



- हैरीचा जन्म २४ मार्च १८५४ मध्ये झाला.
- त्याचा मृत्यू १३ ऑक्टोबर १९२६ मध्ये झाला.
- हैरीचे सगळे प्रयोग खूप धोकादायक होते. तुम्ही कधी ते करण्याचे प्रयत्न करू नका.
- हैरीने ६ चलचित्रामध्ये काम केले. त्यातील काही तुम्ही डीव्हीडी वर पाहू शकतो.
- हैरीला पाळीव प्राण्यांमध्ये कुत्रा आवडत असे. त्याने एका कुत्र्याला हातकडी मधून बाहेर यायला शिकवले होते.

